**श्री.मोहम्मद नसीम रझिउद्दीन सिद्धीकी यांची महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या अध्यक्ष पदी नियुक्ती करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
**शासन निर्णय क्रमांकः राअआ-२००४/प्र.क्र.४१/२००४/३५**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २ जून, २००४.

पहा :- १) शासन निर्णय, क्रमांक:एलएमएन-१०९९/प्र.क्र.४९/३५, दि.४.२.२०००.
२) शासन निर्णय, क्रमांक:एलएमएन-१०९९/प्र.क्र.३९/३५, दि.३१.३.२००३.
३) शासन निर्णय, क्रमांक:एलएमएन-२०००/प्र.क्र.४६/२०००/३५, दि.१५.७.२०००.
४) शासन निर्णय, क्रमांक:एलएमएन-२०००/प्र.क्र.४६/२०००/३५, दि.२४.७.२००३.
५) शासन निर्णय, क्रमांक:एलएमएन-२०००/प्र.क्र.४६/२०००/३५, दि.१९.८.२०००.

**शासन निर्णय** :-

राज्यातील अल्पसंख्याकांच्या हिताची जोपासना व संरक्षण करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र शासनाने राज्य अल्पसंख्याक आयोगाची संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयाद्वारे पुन:स्थापना केलेली आहे. तसेच संदर्भाधीन क्रमांक २ च्या शासन निर्णयाद्वारे महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास दिनांक ४ फेब्रुवारी, २००३ पासून २ वर्षाची मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

२. श्री.मोहम्मद अमीन खंडवाणी यांची संदर्भाधीन क्रमांक ३ च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या अध्यक्षपदी नियुक्ती करण्यात आली होती. तसेच संदर्भाधीन क्रमांक ४ च्या शासन निर्णयाद्वारे श्री.खंडवाणी यांची अध्यक्षपदावरील नियुक्ती दि.१५ जुलै, २००३ पासून पुढील आदेश होईपर्यंत चालू ठेवण्यात आली होती.

३. श्री.मोहम्मद अमीन खंडवाणी यांच्या जागी आता श्री.मोहम्मद नसीम रझिउद्दीन सिद्धीकी, ४, अपना घर बिल्डिंग, सांकली स्ट्रीट, भायखळा, मुंबई - ४०० ००८ यांची महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या अध्यक्षपदी पुढील आदेशापर्यंत किंवा आयोगाची मुदत संपुष्टात येईपर्यंत यापैकी जे प्रथम घडेल त्या दिनांकापर्यंत नियुक्ती करण्यात येत आहे.

४. संदर्भाधीन क्रमांक ५ च्या शासन निर्णयाद्वारे अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांना राज्यमंत्र्यांचा दर्जा देण्यात आलेला आहे. त्याअनुषंगाने अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग श्री.मोहम्मद नसीम रझिउद्दीन सिद्धीकी, यांना अनुज्ञेय असलेल्या सर्व सोई-सुविधा उपलब्ध राहतील.

५. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( श्री. प्र. पाटील )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,

४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

५. मा.मुख्य सचिव,

६. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,

७.* श्री.मोहम्मद अमीन खंडवाणी, खंडवाणी हाऊस, दर्गाह स्ट्रीट, माहिम, मुंबई-१६,

८.* श्री.मोहम्मद नसीम रझिउद्दीन सिद्यीकी, ४, अपना घर बिल्डिंग, सांकली स्ट्रीट, भायखळा, मुंबई - ८,

९. उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,

१०. संबंधित सदस्य, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,

११. विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,

१२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,

१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

१५. सर्व विभागीय आयुक्त,

१६. सर्व जिल्हाधिकारी,

१७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

१८. सर्व मंत्रालयीन विभाग,

१९. मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग व कार्यालय प्रमुख,

२०. राज्य शासनाचे सर्व उपक्रम,

२१.* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

२२.* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

२३.* प्रबंधक, लोक आयुक्त उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,

२४.* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,

२५.* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

२६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी),

२७. कक्ष अधिकारी, माहिती व तंत्रज्ञान कक्ष, मंत्रालय, मुंबई (२ प्रती वेबसाईट साठी )

२८. निवड नस्ती.

* पत्राने.